घरबांधणी अग्रिम

शासकीय कर्मचारी शासकीय सेवेत असतांना मृत्यू पावल्यास, त्यांच्या नावे त्यांना मंजुर झालेली थकित रक्कम सोडून देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
निर्णय क्रमांक: एचबीए-१०७६/सीआर-७६५-जीईएन-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक ५ फेब्रुवारी, १९८१.

## निर्णय.

महाराष्ट्र शासकीय कर्मचारी घरबांधणी अग्रिम नियम १९६२ च्या नियम १४ च्या उप-नियम [डी] अन्वये, शासकीय कर्मचा-यांच्या निवृत्तिपूर्वी मृत्यूच्या वेळी सदर कर्मचा-याच्या नावावर असलेली घरबांधणी अग्रिमाची उर्वरित रक्कम अशा कर्मचा-यांस मंजूर होणा-या उपदानातून वसूल करण्याचा शासनास अधिकार आहे. तसेच उक्त नियमांच्या नियम १४ च्या उप-नियम [आय] अन्वये जर एखादा शासकीय कर्मचारी अग्रिमाच्या संपुर्ण रकमेची परतफेड होण्यापुर्वी मृत्यू पावला, तर सदर अग्रिमाची उर्वरित रक्कम शासनाकडे लगेच भरावी लागते. तथापि त्या वेळेस घर बांधून पुर्ण झालेले नसेल आणि/अथवा शासनाकडे ते गहाण ठेवलेले नसेल तर, शासकीय कर्मचा-यांच्या वारसदारांना अथवा नियम ८ अन्वये समाविष्ट होणा-या जामीदारांना लायक प्रकरणांत उक्त अग्रिम धनाची उर्वरित रक्कम त्यावरील व्याजासह योग्य त्या हप्त्यांमध्ये परतफेड करण्याची परवानगी शासन देऊ शकते.

२. जे शासकीय कर्मचारी शासकीय सेवेमध्ये असतांना मृत्यू पावतात आणि ज्या कर्मचा-यांच्या नावे घरबांधणी अग्रिमाची रक्कम थकित आहे अशा कर्मचा-यांच्या कुटुंबियांना काही सहाय्य देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. एक कल्याण -कारी योजना म्हणून आणि मरण पावलेल्या शासकीय कर्मचा-याच्या कुटुंबियांचे दुःख कमी करण्याच्या दृष्टीने शासनाने असा निर्णय घेतला आहे की, शासकीय कर्मचा-यास सेवेमध्ये असतांना अकाली मृत्यु आल्यास, अशा शासकीय कर्मचा-यास, महाराष्ट्र शासकीय कर्मचारी घरबांधणी अग्रिम नियम १९६२ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या घरबांधणी अग्रिमा -वरील व्याजाची वसुली संबंधीत प्रशासकीय विभागाने सोडून द्यावी. शासकीय कर्मचा-याच्या मृत्यूच्या दिवशी [तारखेस] त्याच्या नावे असलेल्या घरबांधणीअग्रीमाच्या मुद्दलाची वसुली नियमांनुसार अशा शासकीय कर्मचा-यास देय असलेल्या उपदानातून भागविण्यात यावी. अशा प्रकारे मेळ घातल्यानंतर सुद्धा काही बाकी शिल्लक असेल, तर संबंधित प्रशासकीय विभागाने २५,००० रुपयांपर्यन्तची रक्कम सोडून द्यावी. यानंतर सुध्दा एखाद्या प्रकरणी काही रक्कम शिल्लक राहत असेल, तर सदर प्रकरणी वित्त विभागाशी सल्लामसलत करून उक्त रक्कम सोडून द्यावी किंवा कसे याबाबत प्रकरणाच्या गुणांवर परीक्षण करण्यात यावे.

कृ.मा.प....

३. हे आदेश दिनांक १ जानेवारी, १९८१ पासून अंमलात येत आहेत. या संदर्भात जर काही थकित प्रकरणे असतील, तर संबंधित प्रशासकीय विभागाने सदर प्रकरणे वरील आदेशाप्रमाणे नियमित करावीत. तथापि ज्या प्रकरणी यापूर्वीच निर्णय घेण्यात आलेला आहे. अशी प्रकरणे पुन्हा सुरु करण्यात येऊ नयेत.

४. मुंबई वित्तीय नियमावली, १९५९ च्या परिशिष्ट २६ मध्ये योग्य त्या सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

५. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

ज. दा. जाधव,

शासनाचे सह-सचिव, वित्त विभाग.